विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक २८.०२.२०२६ पर्यंत चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय क्र. विचासं ११२०/प्र.क्र.०५/२८-अ (विमान-१)**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ७ मार्च, २०२५

<u>वाचा</u>:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/वि.सु.-१, दि.४.१०.२००४.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एव्हीएन १००८/प्र.क्र.५२६/का.२८-अ, दि.१२.३.२०१०.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एव्हीएन १००८/प्र.क्र.५२६/का.२८-अ, दि.२२.२.२०११.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.विचासं १११९/प्र.क्र.५/का.२८-अ, दि.७.१२.२०२१
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.विचासं १११९/प्र.क्र.५/का.२८-अ, दि.१०.१.२०२३
६) उपसंचालक,विमानचालन संचालनालय यांचे क्र. डीए/एडीएम/२१०/ २०२४, दि.निरंक चे पत्र.
७) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.विचासं १११९/प्र.क्र.५/का.२८-अ(विमान-१) दि.१.४.२०२४
८) उपसंचालक,विमानचालन संचालनालय यांचे क्र. डीए/एडीएम/०८/२०२५, दिनांक ७/१/२०२५ चे पत्र.

**<u>प्रस्तावना:-</u>**

वित्त विभागाच्या दिनांक १२/३/२०१० च्या शासन निर्णयान्वये विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवर एकूण २५ पदांचा आकृतिबंध मंजूर करण्यात आला आहे. विमानचालन संचालनालयाच्या मंजूर २५ पदांपैकी केवळ ९ पदे स्थायी स्वरूपाची असल्यामुळे संदर्भ क्र.३ येथील दिनांक २२/२/२०११ च्या शासन निर्णयान्वये उर्वरीत १६ पदांपैकी ११ अस्थायी पदांना स्थायी करण्यात आले आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ दिनांक ४/१०/२००४ च्या शासन निर्णयाच्या अधिन राहून संदर्भ क्र.७ च्या दिनांक १/४/२०२४ च्या शासन निर्णयान्वये उर्वरीत ५ अस्थायी पदांना (यात संचालक विमानचालन (वर्ग-१) व वैमानिक (वर्ग-१) आणि पोलिस कॉन्स्टेबल वाहन चालक (वर्ग-३)-१, शिपाई (वर्ग-४)-१ आणि स्वच्छक (वर्ग-४)-१ या पदांचा समावेश आहे) दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक २८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. उप संचालक, विमानचालन संचालनालय यांनी

संदर्भ क्र.८ च्या पत्रान्वये सदर अस्थायी पदांना दिनांक १.३.२०२५ ते दिनांक २८.२.२०२६ पर्यंत मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे. सदर पाच पदांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील सोबत जोडलेल्या प्रपत्र "अ" मधील स्तंभ ६ मध्ये नमूद केलेल्या (संचालक, विमानचालन (वर्ग-१)-१, वैमानिक (वर्ग-१)-१,पोलिस कॉन्स्टेबल (वर्ग-३)-१, शिपाई (वर्ग-४)-१ आणि स्वच्छक (वर्ग-४)-१ ) अशा एकूण ५ पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक २८.०२.२०२६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ५ अस्थायी पदांच्या वेतन व भत्ते याकरिताचा खर्च मागणी क्र. " मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७० इतर प्रशासनिक सेवा (००) (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण (००) (०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (अनिवार्य) (२०७० ०१५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/वि.सु.-१, दिनांक ४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२५०३०७१४३२२३७८०७ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA RAJESH CHURI

Digitally signed by APARNA RAJESH CHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=f7c51cdde8909e037ec9e7d72236f3e3c46c61072b3926b1521c06f77d1662cb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1D4D6EA1D0CC1ED1FA0FC3C3FEB482175B2BC0C8BCF42B15DD3EE7D5CC3764F8, cn=APARNA RAJESH CHURI
Date: 2025.03.07 17:23:57 +05'30'

(अ. रा. चुरी)
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक/ उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
२. महालेखपाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग (व्यय-४/अर्थ-१४/वित्तीय सुधारणा) मंत्रालय, मुंबई.
६. सामान्य प्रशासन विभाग / कार्या.२५, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती, सा.प्र.वि. कार्या.२८-अ.

**शासन निर्णय क्र. विचासं ११२०/प्र.क्र.५/२८-अ (विमान-१)**
**दिनांक:- ७.०३.२०२५ चे सहपत्र**

## "प्रपत्र अ"

| अ.क्र. | संवर्ग/ पदनाम | आकृतिबंधानुसार मंजूर पदे | कायम पदे | दि.२२.२.२०११ च्या शासन निर्णयान्वये स्थायी केलेली पदे | दि.२८.२.२०२६ पर्यंत पुढे ठेवावयाची अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | संचालक,विमानचालन | १ | ० | ० | १ |
| २ | मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर) | १ | ० | १ | ० |
| ३ | मुख्य वैमानिक (विमान) | १ | १ | ० | ० |
| ४ | वैमानिक | ५ | ० | ४ | १ |
| ५ | सहाय्यक संचालक | १ | १ | ० | ० |
| ६ | वरिष्ठ लघुलेखक | १ | ० | १ | ० |
| ७ | प्रमुख लिपिक | १ | १ | ० | ० |
| ८ | वरिष्ठ लेखापाल | १ | १ | ० | ० |
| ९ | वरिष्ठ भांडारपाल | १ | १ | ० | ० |
| १० | लेखापाल | १ | १ | ० | ० |
| ११ | पोलीस कॉन्स्टेबल (वाहनचालक) | ४ | ० | ३ | १ |
| १२ | लिपिक टंकलेखक | १ | १ | ० | ० |
| १३ | नाईक | १ | १ | ० | ० |
| १४ | स्वच्छक | २ | ० | १ | १ |
| १५ | शिपाई | २ | ० | १ | १ |
| १६ | सफाईगार | १ | १ | ० | ० |
| | **एकूण** | **२५** | **९** | **११** | **५** |